जलसंपदा प्रकल्पातून घरगुती (पिण्याचे पाणी ) प्रयोजनासाठी अजंटा इंटरनॅशनल विपश्यना समिती, औरंगाबाद याकरीता पाणी आरक्षणाच्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक. बिंसिआ २०१६/(१०९/१६)/सिंव्य (धो)**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक : ०३/४/२०१७

<u>वाचा</u> :- १) कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे दि. ४/२/२०१७ चे पत्र

२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १००१/ (१५४/०१)/सिंव्य(धोरण) दि. २१ जानेवारी २००३.

३) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१३/(४१५/१३)/सिंव्य (धोरण), दि. १६/८/२०१४

४) शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१५/(४४/१५)/सिं.व्य.(धो), दि. १७/११/२०१६

५) शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/२०१५)/सिं.व्य.(कामे), दि.१७/११/२०१६

**<u>प्रस्तावना :-</u>**

१.० संदर्भिय पत्र क्र.१ अन्वये कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचेकडून अजंटा इंटरनॅशनल विपश्यना समिती, औरंगाबाद या संस्थेस घरगुती (पिण्याचे पाणी ) वापराच्या प्रयोजनासाठी पाणी आरक्षणाचा प्रस्ताव प्राप्त झालेला आहे. संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये बिगर सिंचन पाणी आरक्षण प्रस्तावांना मंजुरी देण्यासाठी क्षेत्रिय वाटपाच्या मर्यादेनुसार सुधारित स्तर निश्चित करण्यात आलेले आहेत.या शासन निर्णयाच्या परि.२.२ अन्वये मा.मंत्री(जसं) यांच्या मान्यतेने अजंटा इंटरनॅशनल विपश्यना समिती, औरंगाबाद यांना केसापूरी लघु पाटबंधारे तलावातून ०.००८ दलघमी पाणी आरक्षण मंजुरी देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

| संस्थेचे नांव | पाणी वापराचा प्रकार | जलाशय/कालवा नदीचे नांव | मंजूर केलेले पाणी आरक्षण (दलघमी) | सिंचन क्षेत्रात होणारी कपात(हे.) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| अजंटा इंटरनॅशनल विपश्यना समिती, औरंगाबाद | घरगुती | केसापूरी ल.पा. तलावा ता.जि. औरंगाबाद | ०.००८ | ३ |

२.० उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयानुसार संस्थेने सिंचन क्षेत्र कपातीपोटी ,सिंचन क्षेत्र पुन:स्थापनेचा खर्च रु. १ लक्ष प्रति हेक्टर प्रमाणे (Base Year २००९) अथवा प्रत्यक्ष करारनामा करतेवेळी लागू असलेला शासनाचा प्रचलित दर अथवा भाववाढ निर्देशांक (Cost Inflation Index ) विचारात घेवून यापैकी जो जास्त असेल त्या दराने सिंचन पुन:स्थापनेचा खर्च महामंडळाकडे करारनामा करण्यापूर्वी जमा करण्यात यावा. सिंचन क्षेत्र कपातीपोटी प्राप्त झालेली सिंचन पुन:स्थापनेची रक्कम ही त्याच प्रकल्पाचे सिंचन क्षेत्र पुन:स्थापनेच्या कामासाठी वापरण्यात यावी.

२. बिगर सिंचन पाणी पुरवठयासाठी करारनाम्याचा सुधारीत नमुना व मार्गदर्शक तत्वे महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग शासन परिपत्रक क्र. बिपापू १०००/(७१३/२००१)/सिंव्य (धो), मुंबई ३२, दि. ११/६/२००३ अन्वये निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार करारनामा करण्यात यावा.

३. शासन परिपत्रक क्र. पापव -२०१५६/(प्र.क्र.४००/२०१५)/सिव्य (महसूल) दि.१५/१२/२०१५ अन्वये बिगरसिंचन पाणीवापराचे करारनामे करणे व नुतनीकरण वेळेवर करणे बाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. जलस्त्रोत प्रदुषित करणाऱ्या पाणी वापरकर्त्याकडून दंडनीय पाणीपट्टी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत शासन निर्णय क्र. पापव २०१५/(प्र.क्र. ८८/२०१५)/सिंव्य (महसूल) दि. २१/४/२०१६ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

५. महाराष्ट्र शासन,जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१०/(४०७/१०र)/सिंव्य (धोरण), दि.२९/६/२०११ अन्वये करारनामा करतांना बिगर सिंचन पाणी वापरकर्ते अंतीम पाणी मागणी प्रमाणे टप्पाटप्पाने पाणी वापर करण्याचे नियोजन नमुद करु शकतील.

६. शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/२०१५)/सिंव्य (कामे), दि. १७/११/२०१६ अन्वये पाटबंधारे विकास महामंडळाच्या अधिनियमातील तरतुदीनुसार सिंचन प्रकल्पांचे व्यवस्थापन पाटबंधारे महामंडळाकडे वर्ग करणे व पाणीपट्टीची रक्कम प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी खर्च करण्यास मान्यता देणेसाठीचा निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०४०३१३१८४०५६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2d4c9d30f88b6a2745465552d33743e7c967f8c7a5d287520a1c61013a9d322a, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2017.04.03 13:20:34 +05'30'

**(संअ. टाटू)**

शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव.

२. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.

३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१०. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद
१३. मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक,लाभक्षेत्र विकास जलसंपदा विभाग,औरंगाबाद
१५. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,औरंगाबाद
१६. निवडनस्ती कार्यासन सिंव्य (धोरण)